**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः उसप्र १३२५/प्र.क्र.१७/प्रशा-१**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२५.

<u>संदर्भ</u> : इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे शासन आदेश क्र. आस्थाप्र-२०२२/प्र.क्र.७५/आस्थापना-२, दि.२८.१२.२०२२.

## आदेश

श्रीमती आशाराणी उ. पाटील, उप सचिव यांची संदर्भाधीन आदेशान्वये, इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील 'सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे' या पदावर प्रथमत: २ वर्षांकरिता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती.

२. या प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.०१.०१.२०२५ रोजी संपुष्टात आलेला आहे. आता या आदेशान्वये, श्रीमती आशाराणी उत्तम पाटील, उप सचिव यांच्या 'सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे' या पदावरील प्रतिनियुक्तीस दि.०२.०१.२०२५ पासून पुढे २ वर्षांसाठी म्हणजेच दि.३१.१२.२०२६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२७१११००४१७०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.03.27 11:10:55 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
३. मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स/प्र.स., मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स./प्र.स./सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग /अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सह सचिव/उप सचिव, इतर मगास बहुजन कल्याण विभाग (आस्थापना-२), मंत्रालय, मुंबई.
७. श्रीमती आशाराणी उ. पाटील, उप सचिव तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे.
८. निवडनस्ती प्रशा-१.